**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त मौजे आंबेटेंबे, ता.मुरबाड, जि.ठाणे येथे भिमाई स्मारक बांधण्यासाठी बांधण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०१८/ प्र.क्र.१४४/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३ ऑगस्ट, २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१५/ प्र.क्र.१६३/बांधकामे, दि.९/१०/२०१५
२) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग बैठक-२०१६/ प्र.क्र.४७५/ बांधकामे, दि.१४/३/२०१८
३) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग बैठक-२०१६/ प्र.क्र.४७५/ बांधकामे, दि.२४/३/२०१७
४) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/मावक/मौआं/ऐति.स्थळ/ २०१७-१८/का.१२/३००५, दि.११/४/२०१८.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे या अंतर्गत संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयातील तरतुदीस अनुसरून मा.मंत्री (सा.न्या.वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि.१७/१/२०१८ रोजी झालेल्या बैठकीच्या दि.१/३/२०१८ रोजी इतिवृत्तामध्ये अनुसूचित जाती नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतीकदृष्टया महत्व असलेल्या एकूण ०९ ठिकाणे/स्थळांची यादी अंतिम करण्यात आली आहे. त्यामध्ये मौजे आंबेटेंबे, ता.मुरबाड, जि.ठाणे येथे भिमाई स्मारक बांधकामास मंजूरी देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र. ४ अन्वये आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्यामार्फत मौजे आंबेटेंबे, ता.मुरबाड, जि.ठाणे येथे भिमाई स्मारक बांधण्यासाठी प्राप्त झालेले रू. ४,९८,७४,०००/- (रुपये चार कोटी अठ्यान्नव लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त) इतक्या रक्कमेचा प्रस्ताव छाननीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आला होता. सार्वजनिक बांधकाम विभागाने

परिगणीत केल्यानुसार सदर कामास रू. ४,६६, ६६,०००/- ( रूपये चार कोटी सहासष्ट लक्ष सहासष्ट हजार फक्त) रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती कार्यक्रमाअंतर्गत मौजे आंबेटेंबे, ता.मुरबाड, जि.ठाणे येथे भिमाई स्मारक बांधण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणीत केल्यानुसार रु.४,६६,६६,०००/-(रुपये चार कोटी सहासष्ट लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

<u>अटी व शर्ती</u> :-

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णयक्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
४) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी अंदाजपत्रकावर मुख्य अभियंता, सा.बां. (प्रादेशिक) मुंबई तसेच उपभोक्ता विभागाच्यावतीने सक्षम अधिकाऱ्याचे साक्षांकन आवश्यक आहे.
५) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

२. प्रस्तुत कामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२५-अनुसूतिच जाती व अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२-भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष २२२५ डी ८२३ या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त असलेल्या निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, वित्त विभागाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थहावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०३१२३२०८४०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.08.03 12:33:32 +05'30'

**(अ.कों.आहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, ठाणे.
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
६. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई.
७. सहायक आयुक्त, समाजकल्याण, ठाणे.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
९. मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
१०. मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती / बांधकामे.